**कोषागारात रोख देय अनुदान**

**अर्थसंकल्पीय अनुदान २००९-२०१०**
**किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपअभियान कार्यक्रमासाठी विशेष घटक योजनेखाली (लेखाशीर्ष २२१५ २१४२ ) अनुदाने मंजूर/ मुक्त करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्र. बीयुडी-१००९/प्र.क्र.३०२/पापु-१५
मंत्रालय, मुंबई -३२, दिनांक ११ नोव्हेंबर,२००९

वाचा:- १. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. ग्रापापु-१००१/प्रक्र ३३०/पापु-०७, दिनांक १४ फेब्रुवारी, २००२ व दिनांक २९ ऑगस्ट, २००२ चे शुध्दीपत्रक
२.वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. पूरक-१०.९/प्र.क्र.१५२/अर्थसंकल्प-३ दिनांक ३० जून,२००९

**प्रस्तावना:-**

पिण्याच्या पाणी पुरवठा योजनांच्या उद्भवाची विश्वासार्हता, जलसंधारण व कृत्रिम पुनर्भरणाची कामे, पाऊस पाणी संकलनाची योजना, इ. कार्यक्रम उपअभियान कार्यक्रमांतर्गत राबविले जातात.

सन २००९-२०१० या वर्षाचे खर्चाचे पूरक विवरणपत्र, दिनांक १२ जून, २००९ रोजी विधान मंडळास सादर करण्यात आला असून, सदर पुरवणी खर्चास विधानसभेने मान्यता दिली आहे. दिनांक ३१ मार्च २०१० रोजी संपणाऱ्या वित्तीय वर्षाच्या विनियोजनामध्ये समाविष्ट करण्यासाठी पूरवणी विनियोजन विधेयकास मा. राज्यपालानी संमती दिली आहे आणि ते, महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी ) विनियोजन अधिनियम, २००९ (सन २००९ चा महाराष्ट्र अधिनियम, क्रमांक - १३) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४ दिनांक २० जून, २००९ यामध्ये प्रसिध्द करण्यात आल्याचे संदर्भ क्र.२ येथील परिपत्रकांन्वये वित्त विभागाने कळविले आहे.

सन २००९-२०१० या आर्थिक वर्षासाठी उपअभियान कार्यक्रमासाठी विशेष घटक योजनेखाली (लेखाशीर्ष २२१५ २१४२ ) एकूण रु.८९.८४ लक्षची तरतूद उपलब्ध करुन देण्यात आली आहे. उपलब्ध तरतूदीपैकी नोव्हेंबर २००९ पर्यंत अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेली रु.५०.०० लक्ष इतकी तरतूद संबंधीत जिल्हापरिषदांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २००९-१० या आर्थिक वर्षात किमान गरजा कार्यक्रमाखाली उपअभियान कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणाऱ्या कामासाठी **रु.५०.०० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) एवढे अनुदान सोबतच्या विवरणापत्रातील स्तंभ-४ मध्ये दर्शविलेल्या वाटपानुसार संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद यांना मंजूर करण्यात येत असून अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात**

**येत आहे.** सदर अनुदान संबंधित जिल्हा परिषंदाचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांना पुढील अटीवर रोख्र मुक्त करण्यात येत आहेत.

अ) हे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी जिल्हा परिषदेने खर्च करावे.

ब) या शासन निर्णयाव्दारे, सन २००९-२०१० या आर्थिक वर्षात किमान गरजा कार्यक्रमाखाली उप अभियान कार्यक्रमांतर्गत कामांसाठी मंजूर करण्यात आलेली रक्कम शिवकालीन पाणी साठवण योजनेतंर्गत जिल्हास्तरावर उघडण्यात आलेल्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करावा व त्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

क) या कार्यक्रमांतर्गत घेतलेल्या कामांचा भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचेकडे दर महिन्याच्या ५ तारखेपर्यंत न चुकता सादर करावा.

ड) वरील मंजूर अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनाकडे विहित प्रपत्रात सादर करण्यात यावी.

इ) तसेच मासिक विवरणपत्रानुसार (Cash Flow) अनुदान खर्ची घालण्यात यावे.

२. वरील मंजूर अनुदान, जिल्हा परिषदेने उपअभियान कार्यक्रमांतर्गत, अस्तिवात असलेल्या पाणी पुरवठा योजनांच्या स्त्रोतांचे बळकटीकरणाच्या कामांसाठी मंजूर किंमतीच्या मर्यादेमध्ये खर्च करावे. सदर उपाययोजनेसाठी आवश्यक प्रशासकीय मान्यता दिलेली असणे आवश्यक आहे.

३. यासाठी होणारा खर्च “मागणी क्र. वाय-२, २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता-०१-पाणी पुरवठा-१०२-ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम-अनुसूचित जातीकरीता विशेष घटक योजना-पिण्याचे पाणी पुरवठयाचा ग्रामीण कार्यक्रम-(०२)(२२)उप अभियान (राज्य योजना) (७५:२५)(२२१५-२१४२) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) ” या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व या आर्थिक वर्षासाठी त्याखालील मंजूर तरतूदीतून भागवावा.

४. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra .gov.in या बेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९१११११६२५२०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

**(श.वि.दुर्वे)**

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**१. सर्व विभागीय आयुक्त,**
**२. सर्व जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती**
**३. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे**
**४. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी**
**५. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी**
**६. सर्व जिल्हा परिषदांचे कार्यकारी अभियंता, (ग्रामीण पाणी पुरवठा विभाग)**

७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
८. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
९. सर्व जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी तथा अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१०. सर्व उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा
११. सर्व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१३. महालेखापाल, महाराष्ट्र १- मुंबई/२-नागपूर ( लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता)
१४. मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा, मुंबई
१५. नियोजन विभाग/वित्त विभाग/सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
१६. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासन क्र. ०४,०५,०७ व २०
१७. निवडनस्ती, कार्यासन क्र. पापु-१५

शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. बीयुडी-१००९/प्र.क्र.३०२/पापु-१५,
दिनांक ११ नोव्हेंबर,२००९ चे सहपत्र.

( रुपये लाखात )

| अ.क्र. | जिल्हा परिषंदाचे नाव | सन २००९-१० या आर्थिक वर्षात विशेष घटक योजनांतर्गत उपअभियान कार्यक्रमासाठी मंजूर अर्थसंकल्पीय तरतूद | **या शासन निर्णयाव्दारे अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपअभियान कार्यक्रमासाठी मुक्त करण्यात आलेली तरतूद** |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | ठाणे | ३.९६ | २.२०(रुपये दोन लक्ष वीस हजार फक्त) |
| २. | रायगड | १.०० | ०.५६(रुपये छपन्न हजार फक्त) |
| ३. | रत्नागिरी | ३.४० | १.८९ (रुपये एक लक्ष एकोणनव्वदहजार फक्त) |
| ४. | सिंधुदुर्ग | ०.७७ | ०.४३(रुपये त्रेचाळीस हजार फक्त) |
| | **कोकण विभाग** | **९.१३** | **५.०८(रुपये पाच लक्ष आठ हजार फक्त)** |
| ५. | नाशिक | १.२० | ०.६७(रुपये सदुसष्ट हजार फक्त) |
| ६. | धुळे | ०.२८ | ०.१६(रुपये सोळा हजार फक्त) |
| ७. | नंदुरबार | ०.१६ | ०.०९(रुपये नऊ हजार फक्त) |
| ८. | अहमदनगर | २.२२ | १.२४(रुपये एक लक्ष चोवीस हजार फक्त) |
| | **नाशिक विभाग** | **३.८६** | **२.१६(रुपये दोन लक्ष सोळा हजार फक्त)** |
| ९. | सातारा | ७.९८ | ४.४४(रुपये चार लक्ष चव्वेचाळीस हजार फक्त) |
| १०. | सांगली | ४.५० | २.५०(रुपये दोन लक्ष पन्नास हजार फक्त) |
| ११. | सोलापूर | १३.८० | ७.६८(रुपये सात लक्ष अडुसष्ट हजार फक्त) |
| १२. | कोल्हापूर | ११.३६ | ६.३२(रुपये सहा लक्ष बत्तीस हजार फक्त) |
| | **पुणे विभाग** | **३७.६४** | **२०.९४(रुपये वीस लक्ष चौऱ्याण्णव हजार फक्त)** |
| १३. | औरंगाबाद | ०.४० | ०.२२(रुपये बावीस हजार फक्त) |
| १४. | जालना | १.२० | ०.६७(रुपये सदुसष्ट हजार फक्त) |
| १५. | परभणी | २.१० | १.१७(रुपये एक लक्ष सतरा हजार फक्त) |
| १६. | हिंगोली | २.८० | १.५६(रुपये एक लक्ष छपन्न हजार फक्त) |
| १७. | बीड | ११.३८ | ६.३३(रुपये सहा लक्ष तेहतीस हजार फक्त) |
| १८. | नांदेड | ६.४० | ३.५६(रुपये तीन लक्ष छपन्न हजार फक्त) |
| १९. | उस्मानाबाद | ४.०० | २.२३(रुपये दोन लक्ष तेवीस हजार फक्त) |
| २०. | लातूर | १.४० | ०.७८(रुपये अठ्ठ्याहत्तर हजार फक्त) |
| | **औरंगाबाद विभाग** | **२९.६८** | **१६.५२(रुपये सोळा लक्ष बावन्न हजार फक्त)** |
| २१. | बुलढाणा | ०.३६ | ०.२०(रुपये वीस हजार फक्त) |
| २२. | अकोला | १.४० | ०.७८(रुपये अठ्ठ्याहत्तर हजार फक्त) |
| २३. | अमरावती | २.५० | १.३९(रुपये एक लक्ष एकोणचाळीस हजार फक्त) |
| २४. | यवतमाळ | ०.५१ | ०.२८(रुपये अठ्ठावीस हजार फक्त) |
| | **अमरावती विभाग** | **४.७७** | **२.६५(रुपये दोन लक्ष पासष्ट हजार फक्त)** |
| २५. | वर्धा | ०.८० | ०.४५(रुपये पंचेचाळीस हजार फक्त) |
| २६. | नागपूर | ०.२९ | ०.१६(रुपये सोळा हजार फक्त) |
| २७. | भंडारा | ०.४४ | ०.२४(रुपये चोवीस हजार फक्त) |
| २८. | गोंदिया | १.३२ | ०.७३(रुपये त्र्याहत्तर हजार फक्त) |
| २९. | चंद्रपूर | १.९३ | १.०७(रुपये एक लक्ष सात हजार फक्त) |
| | **नागपूर विभाग** | **४.७८** | **२.६५(रुपये दोन लक्ष पासष्ट हजार फक्त)** |
| | **एकूण** | **८९.८६** | **५०.००(रुपये पन्नास लक्ष फक्त)** |

(श.वि.दुर्वे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन